पथकिनारवर्ती नियमात एकसूत्रता आणण्यासाठी 'इमारत रेषा' व 'नियंत्रणरेषा' याकरिता घ्यावयाची अंतरे.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय क्रमांक - आरबीडी - १०८१/८७१/रस्ते - ७.
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ९ मार्च, २००१.

**प्रस्तावना -**

रस्त्याच्या बाजूने होणा-या वसाहतीमुळे रस्त्यावरील वाहनांच्या वाहतुकीस अडथळे निर्माण होतात. त्याच प्रमाणे अशा वसाहतींमध्ये येणारी वाहने थांबल्यामुळे वाहतुकीस अडथळा येतो. वसाहतींची ही अनिर्बंध वाढ रोखण्यासाठी पथकिनारवर्ती नियम तयार करण्यात आलेले आहेत. या पथकिनारवर्ती नियमात "इमारत रेषा" व "नियंत्रण रेषा" किती अंतरावर असाव्यात हे मुंबई महामार्ग अधिनियम १९५५, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६९, केंद्र शासनाच्या भूपृष्ठ मंत्रालयाचे दि. १३/१/१९७७ च्या मार्गदर्शक सुचना व स्टँडर्ड बिल्डिंग अँड डेव्हलपमेंट कंट्रोल रूल फॉर म्युनिसिपल कौन्सिल ए. बी. सी. मध्ये नमूद करण्यात आलेले आहे.

वरील अधिनियम / नियम यामधील तरतुदींमध्ये एकसुत्रता नसल्यामुळे "इमारत रेषा" व "नियंत्रण रेषा" यासाठी कोणते अंतर घ्यावे याबाबत संभ्रम निर्माण होतो. तसेच या वेगवेगळ्या अधिनियमांचा / नियमांचा अवलंब केल्यामुळे असमानता निर्माण होते. म्हणून हा संभ्रम दूर करण्यासाठी व या अधिनियम / नियमांत समानता आणण्याकरिता एकच सर्वकष धोरण असावे यासाठी शासनाने प्रधान सचिव, (महसूल), महसूल व वन विभाग यांच्या अध्यक्षतेखाली उच्चस्तरीय समिती नेमली होती. त्या समितीने सर्वकष अभ्यास करून काही शिफारशी केल्या. त्या शिफारशी विचारात घेऊन शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय -**

मुंबई महामार्ग अधिनियम १९५५, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६९, त्याच प्रमाणे नगरपालिकेसाठी असणा-या बिल्डिंग बायलॉज अँड डेव्हलपमेंट कंट्रोल रूल या सर्वांसाठी खाली दर्शविल्याप्रमाणे "इमारत रेषा" व "नियंत्रण रेषा" यांची अंतरे विहित करण्यात येत आहेत.

एप ०२ (१०००-०३-०१)१

| अ. क्र. | रस्त्याचा दर्जा | इमारत रेषा | | नियंत्रण रेषा (फॅक्टरी, सिनेमा हॉल, व्यापारी गोडाऊन, मार्केट इ. गर्दी होईल अशी ठिकाणे) | |
|---|---|---|---|---|---|
| | | नागरी व औद्योगिक भाग | अनागरी भाग | नागरी व औद्योगिक भाग | अनागरी भाग |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | द्रुतमार्ग | रस्त्याच्या मध्यापासुन ६० मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन १५ मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन ६० मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन १५ मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन ६० मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन १५ मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन ६० मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन १५ मीटर यापैकी जास्त असेल ते. |
| २ | राष्ट्रीय मार्ग | रस्त्याच्या हद्दीपासुन ३ ते ६ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ४० मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ३७ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ७५ मीटर. |
| ३ | राज्य महामार्ग व प्रमुख राज्य महामार्ग | रस्त्याच्या मध्यापासुन २० मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन ४.५ मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन ४० मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ३७ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ५० मीटर. |
| ४ | प्रमुख जिल्हा मार्ग | रस्त्याच्या मध्यापासुन १५ मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन ४.५ मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन ३० मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ३७ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ४७ मीटर. |

[illegible] ०२ (२०००-०२-०१) [illegible]

| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
|---|---|---|---|---|---|
| ५ | इतर जिल्हा मार्ग | रस्त्याच्या मध्यापासुन १२ मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन ४.५ मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन १५ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन १८ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन ३० मीटर. |
| ६ | ग्रामीण मार्ग | रस्त्याच्या मध्यापासुन १० मीटर अथवा रस्त्याच्या हद्दीपासुन ३.०० मीटर यापैकी जास्त असेल ते. | रस्त्याच्या मध्यापासुन १२ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन १४ मीटर. | रस्त्याच्या मध्यापासुन २५ मीटर. |

टिप -

१) डोंगराळ भागात, द्रुतमार्ग वगळता इतर सर्व प्रकारच्या रस्त्यासाठी इमारत रेषा व नियंत्रण रेषा या एकच असुन त्या रस्ता हद्दीपासुन ५ मीटर अंतरावर असाव्या.

२) ज्या ठिकाणी महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळातर्फे औद्योगिक क्षेत्र विकसित करण्यात येवून रस्त्याच्या बाजूस सेवा रस्ता विकसित करण्यात आलेला आहे. त्या भागात वरील नियम लागू होणार नाहीत. त्या भागात सेवा रस्त्याच्या पलिकडे होणारी बांधकामे ही महाराष्ट्र राज्य औद्योगिक विकास महामंडळाच्या नियमानुसार होतील.

३) नगरपालिका क्षेत्रात शासनाच्या रस्त्याच्या हद्दीपलिकडे स्थानिक संस्थेने सेवा रस्त्याची आखणी करून ते बांधावेत. जर नगरपालिका हद्दीतील जुन्या गावठाण भागात किंवा अनियंत्रित विकसित झालेल्या भागामध्ये राज्यमार्गाच्या हद्दीत स्थानिक नगरपालिका/नगरपरिषद यांच्याकडून सेवा रस्ता बांधण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे परवानगी बाबत विनंती आल्यास, राज्य शासनाच्या रस्त्याच्या हद्दीत ३० मीटर जागा उपलब्ध असल्यास कडेपासुन ७.५ मीटर रुंदीचा सेवा रस्ता बांधण्यास परवानगी बाबत विचार करण्यात येईल. मात्र स्थानिक संस्थांच्या नवीन वाढीव हद्दीत सेवा रस्त्याची तरतुद विकास आराखड्यात करून ते बांधण्याबाबत आग्रह धरण्यात यावा.

४) सेवा रस्ते बांधण्यास आवश्यक असलेला निधी उभा करण्याकरिता स्थानिक संस्थांतर्फे प्लॉट धारकांकडून विकास कर वसुल करण्यात यावा. व हा निधी सेवा रस्ता बांधण्यासाठीच वापरण्यात यावा. तसेच राज्यमार्गाला जागोजागी छेद देणे योग्य होणार नाही. तेव्हा संचालक

नगररचना व मुल्य निर्धारण विभाग यांनी आराखडा मंजूर करतांना ही बाब लक्षात ठेवून अटी विहित कराव्यात.

५) वेगवेगळ्या शहराच्या बाबतीत ज्यावेळी वर्गीकृत रस्त्यासाठी वळण रस्त्याची बांधकामे पूर्ण होतील, त्या त्या वेळी शहरातून जाणारे वर्गीकृत रस्ते अवर्गीकृत (डि - क्लासिफाय) करणारी अधिसूचना सा. बां. विभागामार्फत प्रसिध्द करण्यात यावी. अशा प्रकारे वर्गीकृत रस्ते अवर्गीकृत होताच सदर रस्त्याचा ताबा संबंधित महानगरपालिका / नगरपरिषदेला द्यावा.

सांकेतांक क्र. २०१११२२१५०६४८०२२००१.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(सं. श्री. काळे)
अवर सचिव

प्रत -

मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मंत्री (सा. बां.), यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (सा. बां.) यांचे खाजगी सचिव
प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव (रस्ते), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
सार्वजनिक बांधकाम विभागातील रस्ते व इमारती कार्यासनातील सर्व अधिकारी व कार्यासने
सहव्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, नेपियन सी रोड, मुंबई
सर्व मुख्य अभियंते (विद्युत वगळून)
सर्व महसूल आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
संचालक, नगर रचना व मुल्य निर्धारण विभाग, सेंट्रल बिल्डिंग, पुणे.
सर्व अधिक्षक अभियंते (विद्युत वगळून)
सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग (विद्युत वगळून)/सर्व जिल्हापरिषद
सर्व महानगरपालिका/नगरपालिका
निवड नस्ती, कार्यासन रस्ते - ७.

---x---

एच ०२ (२०००-०३-०१)२३